महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाच्या कार्यालयीन खर्चाकरिता सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात अनुदान वितरीत करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- राअआ-२०२५/प्र.क्र.५८/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक: २८ मे, २०२५

**संदर्भ :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं- २०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.७ एप्रिल, २०२५.
२) सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांचे पत्र क्र.राअआ/संकिर्ण/प्र.क्र.१५६/का-२ दिनांक २१ एप्रिल, २०२५ रोजीचे पत्र व त्यासोबतचे सहपत्र.

**प्रस्तावना -**

सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाच्या कार्यालयीन खर्चाकरिता अनुदान उपलब्ध करून देण्याबाबत संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी विनंती केलेली आहे. त्यानुसार, सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात लेखाशिर्ष “२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षाखाली अर्थसंकल्पित निधीपैकी बीम्स प्रणालीवरील उपलब्ध निधीमधून महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाचा कार्यालयीन खर्च भागविण्याकरीता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयासाठी सन २०२५-२६ या आर्थिक वर्षामध्ये “२२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.४१,७५,०००/- (अक्षरी रुपये एकेचाळीस लक्ष पंच्याहत्तर हजार फक्त) इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे.

२. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग यांनी सदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई या कार्यालयाच्या कार्यालयीन खर्चाकरिता अनुदान मिळण्याची विनंती केलेली आहे. त्यानुषंगाने, सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर)” या उद्दिष्टाखाली अर्थसंकल्पित निधीपैकी सद्यस्थितीत बीम्स प्रणालीवरील उपलब्ध निधीच्या मर्यादेत महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग या कार्यालयास कार्यालयीन खर्चाकरिता रू.१८,३०,८००/-(अक्षरी रुपये- अठरा लक्ष तीस हजार आठशे फक्त) इतके वेतनेतर

अनुदान खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगास वितरित करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

| **अ.क्र.** | **तपशीलवार लेखाशिर्ष** | **सन २०२५-२६ करिता अर्थसंकल्पिय तरतूद** | **अर्थसंकल्पित निधीपैकी बीम्स प्रणालीवर उपलब्ध निधी** | **सन २०२५-२६ या आर्थिक वर्षात वितरित करावयाचा निधी** |
|---|---|---|---|---|
| १. | २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१-सहायक अनुदाने (वेतनेत्तर) | ४१,७५,०००/- | १८,३७,०००/- | १८,३०,८००/- |
| | | | | (अक्षरी रुपये- अठरा लक्ष तीस हजार आठशे फक्त) |

३. सदर तरतूद सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांच्याकडे सुपूर्द करण्यात येत आहे. याकरिता, अवर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे आहरण व संवितरण अधिकारी तर सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई हे नियंत्रक अधिकारी म्हणून काम पाहतील. महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोगाने सन २०२५-२६ च्या मासिक निधी विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे आयोगाच्या कार्यालयाचा खर्च विहित मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी. आयोगाने कोणत्याही प्रकारची खरेदी वा दुरुस्ती करताना शासनाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या आदेशाचे तंतोतंत पालन करावे. तसेच ज्या उद्दीष्टाकरिता निधी वितरीत करण्यात आले आहे केवळ त्याकरिताच खर्च करण्यात यावे. या आदेशान्वये वितरीत करण्यात आलेल्या निधीतून केलेल्या खर्चाचा तपशील, उपयोगिता प्रमाणपत्र Utilization Certification शासनास वेळोवेळी सादर करणे बंधनकारक आहे. संदर्भ क्र.(१) मधील वित्त विभागाच्या शासन परिपत्रकान्वये विहीत अटी व तरतुदींचे काटेकोरपणे पालन महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई यांनी करावे.

४. उपरोक्त बाबीवरील खर्च "मागणी क्र. झेडई -१, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम (०१) (१६) राज्य अल्पसंख्याक आयोग २२३५ ए २४९ (अनिवार्य), ३१, सहायक अनुदाने (वेतनेत्तर)" या लेखाशिर्षाखाली सन २०२५-२६ या वर्षाकरिता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय "वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, दि. १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या-त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं- २०२५/प्र.क्र.४४/अर्थ-३, दि.७ एप्रिल, २०२५ मधील अटींची तसेच सोबतच्या परिशिष्टामधील सर्व बाबींची पुर्तता करण्याच्या अटीस अनुसरुन तसेच वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.१७८/२०२५/व्यय १, दिनांक ०९.०५.२०२५ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे."

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२५०५२८१२२९४१२५१४ असा आहे. सदर शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2025.05.28 12:30:30 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**

**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग, मुंबई

२. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा /लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई.

३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,

४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,

५. अवर सचिव, ( व्यय-४), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

६. कक्ष अधिकारी, (का-७) , अल्पसंख्यांक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-४०००३२

७. निवडनस्ती (कार्यासन-९).